स्वयंसेवी संस्थांकडून आदिवासी विद्यार्थ्यांसाठी चालविल्या जाणाऱ्या मान्यता प्राप्त अनुदानित आश्रमशाळातील अतिरिक्त ठरलेल्या शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांचे समायोजन होईपर्यंत त्यांना "काम नाही, वेतन नाही" धोरण लागू करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## आदिवासी विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः अआशा २०१६/प्र.क्र.१२९/का-११**

**मंत्रालय, विस्तारभवन, मुंबई ४०० ०३२**

**तारीख: २९ एप्रिल, २०१७**

**वाचा -**

१) शासन निर्णय क्रमांकः वित्त विभाग क्र. असंक१००१/प्र.क्र.२१/२००१ वित्तीय सुधारणा दि.१० सप्टेंबर २००१

२) शासन निर्णय क्रमांकः विभशा-२०१२/१४९७/प्र.क्र.२२१/विजाभज-२ दि.१६ ऑक्टोबर २०१२

३) शासन निर्णय क्रमांकः मा.उच्च न्यायालय मुंबई यांचा याचिका क्र. ४३०५/२०१४ व याचिका क्र. ५३०३/२०१४ मधील निर्णय अनुक्रमे दि. २७ जानेवारी, २०१५ दि. १६ फेब्रुवारी, २०१५ दिलेले आदेश.

४) महाराष्ट्र खाजगी शाळांमधील कर्मचारी (सेवेच्या शर्ती) नियमावली १९८१ मधील नियम २५ अ (२) व पोट नियम (१)

५) शासन निर्णय ,आदिवासी विकास विभाग क्र .अआशा२०११/प्र.क्र.३७५/का-११ दि . ७ मार्च , २०१३

६) शासन निर्णय ,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र. याचिका- २०१५/ प्र.क्र.१५०/ विजाभज-२ दि. १ एप्रिल , २०१६

७) शासन निर्णय ,आदिवासी विकास विभाग क्र .अआशा२०१६/प्र.क्र.१२९/का-११ दि . ८ जून, २०१६

८) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र. याचिका २०१५/ प्र.क्र.१५०/ विजाभज-२ दि. १७ ऑक्टोबर, २०१६

**शुध्दिपत्रक -**

मा. उच्च न्यायालयाने उपरोक्त नमूद केलेल्या याचिका क्र. ४३०५/२०१४ व ५३०४/२०१४ मधील आदेशाची अंमलबजावणी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने संदर्भाधिन क्र. ६ येथील शासन निर्णयान्वये केलेली आहे. त्याच अनुषंगाने आदिवासी विकास विभागांतर्गत चालविण्यात येणाऱ्या अनुदानित आश्रमशाळांपैकी मान्यता रद्द झालेल्या आश्रमशाळांतील कर्मचाऱ्यांबाबत संदर्भ क्र. ७ अन्वये विभागाने शासन निर्णय निर्गमित केला आहे.

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाअंतर्गत असलेल्या विजाभज आश्रमशाळांतून अतिरिक्त ठरलेल्या कर्मचाऱ्यांनी मा. मुंबई उच्च न्यायालय येथे दाखल केलेल्या याचिकेच्या अनुषंगाने मा. उच्च न्यायालयाने दिलेल्या दि.१.१०.२०१६ रोजीच्या निर्देशानुसार सामाजिक न्याय विभागाने दि.१७.१०.२०१६ अन्वये शासन शुध्दिपत्रक निर्गमित केले आहे. आदिवासी विकास विभागाच्या अखत्यारीतील मान्यता रद्द अनुदानित आश्रमशाळेतील कर्मचारी, संलग्न विविध संघटना तसेच लोकप्रतिनिधी यांनीसुध्दा सदर शासन निर्णयास विरोध दर्शविला असून काही कर्मचाऱ्यांनी या निर्णयाविरुध्द याचिकाही दाखल केल्या आहेत. यास्तव शासन निर्णय क्र.अआशा २०१६/प्र.क्र.१२९/का-११ दि.८ जून, २०१६ मधील परिच्छेद २ रद्द करुन त्याऐवजी खालील परिच्छेद अंतर्भूत करण्यात येत आहे.

२. विद्यार्थी संख्या कमी झाल्यामुळे आश्रमशाळेचा एखादा वर्ग/तुकडी कमी झाल्यास तथापि, सदर शाळा सुरु असल्यास अतिरिक्त ठरलेल्या शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांबाबत महाराष्ट्र खाजगी शाळांमधील कर्मचारी (सेवेच्या शर्ती) नियमावली, १९८१ मधील नियम २६ व २७ मधील तरतूदी अनुसार कार्यवाही करण्यात यावी. परंतु त्याचे वेतन बंद न करता त्यांचे समायोजन होईपर्यंत वेतन सुरुच राहील. मात्र सदरहू कर्मचाऱ्यांचे अन्य आश्रमशाळेत प्राथम्याने समायोजन करण्याची कार्यवाही करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४२९१६४५५५४२२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subrao Narayan Shinde

Digitally signed by Subrao Narayan Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ffa7b5a27faed7560194e6272933cfa60dca1eb8ab54859eae7920c9d0d1f622, cn=Subrao Narayan Shinde
Date: 2017.04.29 16:47:49 +05'30'

**( सु. ना. शिंदे )**
उपसचिव,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
२. अपर आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य नागपूर / नाशिक / ठाणे / अमरावती.
३. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

४. मा.मंत्री (आदिवासी विकास), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५. मा. राज्यमंत्री (आदिवासी विकास), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
६. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
७. मा. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
८. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
९. मा. निबंधक, उच्च न्यायालय, मुंबई / खंडपीठ नागपूर / खंडपीठ औरांगाबाद.
१०. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
११. सरकारी अभियोक्ता, उच्च न्यायालय, मुंबई / नागपूर / औरंगाबाद.
१२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य, आदिवासी विकास महामंडळ मर्या. नाशिक
१३. शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४. शिक्षण संचालक, (उच्च शिक्षण ) महाराष्ट्र राज्य, पुणे.
१५. महालेखापाल (लेखा परिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
१६. महालेखापाल (लेखा परिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, नागपूर
१७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१८. निवडनस्ती